# महाराष्ट्र शासन

**क्रमांक : बीसीएच-२०२३/प्र.क्र.१५६ /शिक्षण-२**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३१ जुलै, २०२३

**विषय:-** महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ च्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना वसतिगृहांच्या परीरक्षणासाठी अनुदाने (लेखाशिर्ष २२२५ ०५३९) ३१, सहायक अनुदाने वेतनेतर या योजनेअंतर्गत तरतूद वितरीत करण्याबाबत....

**वाचा :** १.वित्त विभाग,शासन परिपत्रक,क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दिनांक १२ एप्रिल,२०२३
२.शासन ज्ञापन,समक्रमांक दिनांक २०.४.२०२३

**ज्ञापन :-**

महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ च्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना वसतिगृहांच्या परीरक्षणासाठी अनुदाने (लेखाशिर्ष २२२५ ०५३९ )३१,सहायक अनुदाने वेतनेतर या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी रू.१४०.०० कोटी (अक्षरी रूपये एकशेचाळीस कोटी) इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भिय दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन परिपत्रकास अनुलक्षुन संदर्भिय दिनांक २० एप्रिल,२०२३ च्या ज्ञापनान्वये रू.१४ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. आता, वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार वार्षिक तरतुदीच्या ४० टक्के म्हणजेच रू.५६.००कोटी इतका निधी वितरीत करण्यास व खर्च करण्यास ज्ञापनाव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

( रूपये हजारात )

| अ. क्र. | लेखाशिर्ष व उद्दिष्ट | सन २०२३-२४ ची अर्थसंकल्पीत तरतूद | दि.२०.४.२०२३ च्या ज्ञापनान्वये वितरीत तरतूद | आता वितरीत केलेली तरतूद तरतूद | वितरीत एकूण एकूण तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | २२२५ ०५३९,३१ सहायक अनुदाने वेतनेतर | १४०००० | १४०००० | ४२०००० | ५६०००० |

२. सबंधित नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना क्रमांक ५ मध्ये वितरीत करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे खर्चाचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करावे. तसेच, स्वयंसेवी संस्थांना निधीचे वितरण करताना जिल्हा व विभागनिहाय वसतीगृहाची संख्या व वसतीगृहांचे बाबनिहाय प्रलंबित दायित्व विचारात घेऊन त्यानुसार निधी वितरीत करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच,निधी वितरीत करताना

कर्मचाऱ्यांचे मानधन या बाबीसाठी प्राधान्याने वितरीत करून निधी वितरणात प्रादेशिक असमतोल होणार नाही,याची काटेकोरपणे काळजी घ्यावी.

३. उपरोक्त योजनेअंतर्गत चालू आर्थिक वर्षातील खर्चाचे तसेच मागील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकारी यांनी तपासण्याच्या अधीन राहून निधी खर्च करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील.तसेच, वित्तीय नियमावली,महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका यानुसार वेळोवेळी वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करून कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी आयुक्त,समाज कल्याण आयुक्तालय,पुणे यांची राहिल.

४. सदर ज्ञापन हे वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्रमांक ७०९/२०२३/व्यय-१४,दि.१४.७.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक संकेतांक २०२३०७३११३०९०८३२२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL KONDAJI AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a4735 6798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA49 3C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2023.07.31 13:10:28 +05'30'

(अ.कों.आहिरे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त,समाज कल्याण,महाराष्ट्र राज्य,पुणे
२. महालेखापाल,१ व २ ( लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र,मुंबई / नागपूर
३. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
४. वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-३), मंत्रालय, मुंबई
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण सर्व
७. जिल्हा समाज कल्याण अधिकारी सर्व
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. निवडनस्ती (शिक्षण-२).